**आशाताई मुडे बहुउद्देशिय शिक्षण प्रसारक मंडळ, नागपूर संचालित १)श्रीमती आशाताई मुडे प्राथमिक विद्यालय, २) मारोतराव मुडे हायस्कूल व कनिष्ठ महाविद्यालय, हुडकेश्वर रोड, नागपूर या शाळांचे स्वर्गीय साहेबराव भिसे शिक्षण संस्था, नागपूर या संस्थेस हस्तांतर करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः प्राशाह ३०२१/प्र.क्र.३४०/एसएम-१**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : २३ नोव्हेंबर, २०२१

वाचा : शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्रमांक माशाह २०११/ (२१०/११) माशि-३, दिनांक १७ फेब्रुवारी, २०१२

संदर्भ : विभागीय शिक्षण उपसंचालक, नागपूर विभाग नागपूर यांचे जा.क्र.प्राथ/ब/४७८९/२०२१, दिनांक १३.०८.२०२१ चे पत्र.

**प्रस्तावना :**

आशाताई मुडे बहुउद्देशिय शिक्षण प्रसारक मंडळ, नागपूर संचालित १) श्रीमती आशाताई मुडे प्राथमिक विद्यालय, (इयत्ता १ ली ते ४ थी, अनुदानित, मराठी माध्यम) २) मारोतराव मुडे हायस्कूल (इयत्ता ५ वी ते १० वी, अनुदानित, मराठी माध्यम) व कनिष्ठ महाविद्यालय, (इयत्ता ११ वी व १२ वी कला, विज्ञान व वाणिज्य, विनाअनुदानित, मराठी माध्यम) हुडकेश्वर रोड, नागपूर या शाळांचे, स्वर्गीय साहेबराव भिसे शिक्षण संस्था, नागपूर या संस्थेस हस्तांतर करण्याचा संदर्भाधीन पत्रान्वये प्राप्त झालेला प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :**

सदर दोन्ही शाळेचे, स्वर्गीय साहेबराव भिसे शिक्षण संस्था, नागपूर या संस्थेकडे हस्तांतर करण्यास खाली नमूद अटी व शर्तीवर मान्यता देण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे :-

(१) व्यवस्थापन बदल झालेल्या शाळेची किमान पटसंख्येची अट कोणत्याही कारणास्तव शिथिल केली जाणार नाही.

(२) व्यवस्थापन बदल झालेल्या शाळेच्या बाबतीत शासन परवानगीच्या/मान्यतेच्या कोणत्याही अटी व शर्तीमध्ये बदल होणार नाहीत याची खबरदारी घेण्यात यावी.

(३) शासनाकडून शाळा, शिक्षक/ शिक्षकेतर कर्मचारी, वेतन/वेतनेत्तर अनुदान, विद्यार्थी इ. बाबत वेळोवेळी विहित करण्यात येणारे अधिनियम, नियम, आदेश इ. चे पालन करणे नवीन संस्थेस बंधनकारक राहील.

(४) सदर व्यवस्थापन बदल, शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रिडा विभाग, क्रमांक: माशाह २०११/(२१०/११) माशि-३, दिनांक १७ फेब्रुवारी, २०१२ मध्ये विहित केलेल्या नियमानुसार व कार्यपद्धतीनुसार अंमलात येईल.

(५) सदर व्यवस्थापन बदलासंदर्भात शासनाकडे अथवा शिक्षण विभागाच्या क्षेत्रिय अधिकाऱ्यांकडे नव्याने तक्रारी प्राप्त झाल्यास किंवा व्यवस्थापन बदला संदर्भातील अटी व शर्तीचा भंग झाल्याचे निदर्शनास आल्यास किंवा व्यवस्थापन बदलापूर्वीच्या संस्थेतील कार्यरत शिक्षक/शिक्षकेतर कर्मचाऱ्यांच्या सेवाशर्तीचा नवीन संस्थेद्वारा भंग झाल्यास, हस्तांतर रद्द करण्याचे अधिकार शासनास राहतील.

२. विभागीय शिक्षण उपसंचालक, नागपूर विभाग नागपूर यांनी सर्व बाबी तपासून व वरील अटी/शर्ती व्यतिरिक्त आवश्यक अटींचा समावेश करून, शाळेचे व्यवस्थापन बदलाबाबत पुढील कार्यवाही १५ दिवसात करावी व त्याबाबत शासनास अवगत करावे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२१११२३१११८२१२५२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pravin Rajaram Mundhe

Digitally signed by Pravin Rajaram Mundhe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education and Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ad4976f306de2810214ec2ea330d9daea59f1d3f45fae9227a3feaa541af10d1, serialNumber=dc78036626ec580d66c0ac502d43af5f670b5ba13f51213ad071acd53714a284, cn=Pravin Rajaram Mundhe
Date: 2021.11.23 11:20:35 +05'30'

**( प्रविण मुंढे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :**

१) शिक्षण संचालक (माध्यमिक), शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२) विभागीय शिक्षण उपसंचालक, नागपूर विभाग नागपूर.
३) शिक्षणाधिकारी (माध्यमिक), जिल्हा परिषद, नागपूर,
४) अध्यक्ष/ सचिव, आशाताई मुडे बहुउद्देशिय शिक्षण प्रसारक मंडळ, नागपूर
५) अध्यक्ष/ सचिव, स्वर्गीय साहेबराव भिसे शिक्षण संस्था, नागपूर.
६) निवडनस्ती ( एसएम-१).